**<u>यशवंत पंचायत राज अभियान सन २०२३-२४</u>**
**राज्यातील अत्युत्कृष्ट जिल्हा परिषद व पंचायत समित्या यांना महसूली विभागस्तरीय व राज्यस्तरीय पुरस्कार प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०२३/प्र.क्र.१२२/पंरा-१**
बांधकाम भवन, तळमजला, २५ मर्झबान रोड, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
तारीख: - ०६ मे, २०२५

**वाचा- शासन निर्णय क्रमांक : झेडपीए २०२३/प्र.क्र.१२२/पंरा-१,दिनांक १६ फेब्रुवारी, २०२४.**

**प्रस्तावना:-**

ग्रामीण महाराष्ट्राच्या विकासामध्ये "पंचायत राज" संस्थांचे योगदान मोठे आहे. राज्यामधील विकासाच्या प्रमुख योजना पंचायत राज संस्थांमार्फत राबविल्या जातात. पंचायत राज संस्थांना त्यांनी केलेल्या कामगिरीनुसार प्रोत्साहित करुन त्यांची कार्यक्षमता अधिक वाढविणे व त्यांच्यामध्ये उत्कृष्ट कामांची स्पर्धा निर्माण करणे आवश्यक आहे. यासाठी राज्यात पंचायत राज संस्थांचे व्यवस्थापन व विकास कार्यात अत्युत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींसाठी सन २००५-२००६ या आर्थिक वर्षापासून विभागस्तर व राज्यस्तरावर "यशवंत पंचायत राज अभियान" ही पुरस्कार योजना सुरु करण्यात आलेली आहे.

सन २०२३-२४ या वर्षापासून पुरस्कार योजनेचे नाव "यशवंतराव चव्हाण पंचायत राज अभियान" असे करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. पंचायत राज प्रशासन व विकास कार्यात उत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांनी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये केलेल्या कामाचे मूल्यमापन विचारात घेऊन महसूली विभागस्तर व राज्यस्तर अशा दोन स्तरावर "यशवंतराव चव्हाण पंचायत राज अभियान" ही अभिनव पुरस्कार योजना यावर्षी देखील राबविण्यात आली. सदर अभियानांतर्गत राज्यातील अत्युत्कृष्ट तीन जिल्हा परिषदा व तीन पंचायत समित्या पुरस्कारासाठी राज्यस्तरावर निवड करण्यात येते. तसेच विभागस्तरावर तीन पंचायत समित्यांची पुरस्कारासाठी निवड करण्यात येते. सदर पंचायत राज संस्थांची निवड करण्यासाठी तालुकास्तरावर, जिल्हास्तरावर, विभागस्तरावर आणि राज्यस्तरावर पारितोषिक निवड समितीची स्थापना करण्यात आलेली होती. याबाबतच्या सूचना संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १६ फेब्रुवारी, २०२४ अन्वये देण्यात आल्या होत्या.

विभागस्तरीय मूल्यांकन समितीने शिफारस केलेल्या प्रत्येक महसूल विभागातून प्रथम आलेल्या जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांची या विभागाच्या दिनांक १६ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरून क्षेत्रिय स्तरावर पडताळणी करणे आवश्यक होते. त्यासाठी राज्यस्तरीय पारितोषिक निवड समितीच्या वतीने विभागीय आयुक्त कार्यालयांची अदला बदल करून क्षेत्रिय पडताळणी करण्याबाबतच्या सुचना विभागीय आयुक्त कार्यालयांना देण्यात आल्या होत्या. सर्व विभागीय आयुक्त कार्यालयांकडून पंचायत राज संस्थांचे क्षेत्रिय पडताळणी अहवाल शासनास प्राप्त झाले आहेत. त्यानुसार पुरस्कार जाहिर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यस्तरावर अत्युत्कृष्ट "पंचायत राज संस्थांची" निवड करण्यासाठी राज्यस्तरीय मूल्यांकन समितीची सोमवार दिनांक २४ फेब्रुवारी, २०२५ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. राज्यस्तरीय पारितोषिक निवड समितीने, राज्यस्तरीय पडताळणी समितीकडून प्राप्त झालेल्या अहवालाची तपासणी करून प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाच्या पुरस्कारासाठी पुढील प्रमाणे अत्युत्कृष्ट तीन जिल्हा परिषदा व तीन पंचायत समित्यांची राज्यस्तरावर निवड केली आहे.

**राज्यस्तर पुरस्कार :-**

**अ) जिल्हा परिषद**

| | | | |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा परिषद, वर्धा | प्रथम पारितोषिक | ३०.०० लक्ष |
| २ | जिल्हा परिषद, अमरावती | द्वितीय पारितोषिक | २०.०० लक्ष |
| ३ | जिल्हा परिषद, सोलापूर | तृतीय पारितोषिक | १७.०० लक्ष |

**ब) पंचायत समिती**

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पंचायत समिती कळमेश्वर , जि.नागपूर | प्रथम पारितोषिक | २०.०० लक्ष |
| २ | पंचायत समिती जामनेर, जि. जळगाव | द्वितीय पारितोषिक | १७.०० लक्ष |
| ३ | पंचायत समिती शिराळा, जि. सांगली | तृतीय पारितोषिक | १५.०० लक्ष |

तसेच प्रत्येक महसूल विभागस्तरीय समितीने पुरस्कारासाठी शिफारस केलेल्या पंचायत समित्यांमधून राज्यस्तरीय मुल्यांकन समितीने निवड केलेल्या प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाच्या अत्युत्कृष्ट पंचायत समित्यांची नावे खालील प्रमाणे आहेत.

**विभागस्तरीय पुरस्कार प्राप्त पंचायत समिती :-**

| अ.क्र. | विभाग | पुरस्कार प्राप्त पंचायत समिती | क्रमांक | बक्षिसाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | **कोकण** | पंचायत समिती शहापूर, जि. ठाणे | प्रथम | ११ लक्ष |
| | | पंचायत समिती कुडाळ, जि. सिंधुदुर्ग | द्वितीय | ८ लक्ष |
| | | पंचायत समिती कणकवली, जि. सिंधुदूर्ग | तृतीय | ६ लक्ष |
| २ | **नाशिक** | पंचायत समिती जामनेर, जि. जळगाव | प्रथम | ११ लक्ष |
| | | पंचायत समिती राहाता जि.अहमदनगर | द्वितीय | ८ लक्ष |
| | | पंचायत समिती कळवण, जि. नाशिक | तृतीय | ६ लक्ष |
| ३ | **पुणे** | पंचायत समिती शिराळा, जि. सांगली | प्रथम | ११ लक्ष |
| | | पंचायत समिती पंढरपूर, जि. सोलापूर | द्वितीय | ८ लक्ष |
| | | पंचायत समिती खानापूर, जि. सांगली | तृतीय | ६ लक्ष |
| ४ | **अमरावती** | पंचायत समिती शेगाव, जि. बुलढाणा | प्रथम | ११ लक्ष |
| | | पंचायत समिती धारणी, जि. अमरावती | द्वितीय | ८ लक्ष |
| | | पंचायत समिती अचलपूर, जि. अमरावती | तृतीय | ६ लक्ष |
| ५ | **छ.सं.नगर** | पंचायत समिती लातूर, जि. लातूर | प्रथम | ११ लक्ष |
| | | पंचायत समिती अंबाजोगाई, जि. बीड | द्वितीय | ८ लक्ष |
| | | पंचायत समिती औसा, जि. लातूर | तृतीय | ६ लक्ष |
| ६ | **नागपूर** | पंचायत समिती कारंजा (घा.), जि. वर्धा | प्रथम | ११ लक्ष पारितोषिक विभागून |
| | | पंचायत समिती कळमेश्वर, जि. नागपूर | | |
| | | पंचायत समिती सावनेर, जि. नागपूर | द्वितीय | ८ लक्ष |
| | | पंचायत समिती सेलू, जि. वर्धा | तृतीय | ६ लक्ष |

अंतिम निवड केलेल्या पंचायत समित्या व जिल्हा परिषदांना शासनस्तरावरून बक्षिस वितरण समारंभाचे आयोजन करून राज्यस्तरीय व विभागस्तरीय पुरस्काराचे वितरण करण्याचे नियोजन करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०५०६११२२४४६६२०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD SUDHAKAR GANGURDE

Digitally signed by PRASAD SUDHAKAR GANGURDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=3285c93d20470a4f5b344068a77bc3a3ff2b5f53086f51b3c03ff82813bfe2d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=18555E8F1A7CFD31CA5278AFB5C8EE677EB91FD95E641CD6359C9F64E6AF258A, cn=PRASAD SUDHAKAR GANGURDE
Date: 2025.05.06 15:50:08 +05'30'

**(डॉ.प्रसाद गांगुर्डे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
४) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
५) मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद यांचे खाजगी सचिव
६) मा. मंत्री (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे खाजगी सचिव
७) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे खाजगी सचिव
८) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय मुंबई यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
९) सर्व मा. विधानसभा/ मा. विधान परिषद सदस्य
१०) सर्व मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद
११) मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहाय्यक, बांधकाम भवन, मुंबई
१२) मा.प्रधान सचिव (माहिती व जनसंपर्क) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय मुंबई
१३) सर्व विभागीय आयुक्त
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
१५) उप सचिव/ सह सचिव (सर्व),ग्राम विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
१६) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.